# बॅरी:
# सगळ्यात शूर सेंट बर्नार्ड



लेखनः लिन हॉल

चित्रः अन्टोनियो कास्ट्रो

मराठी: अश्विनी बर्वे

# बॅरी:
# सगळ्यात शूर सेंट बर्नार्ड

लेखनः लिन हॉल

चित्रः अन्टोनियो कास्ट्रो

मराठी: अश्विनी बर्वे





पहाडावर पडलेला बर्फ बुडणाऱ्या सूर्याच्या किरणामुळे गुलाबी दिसत होता. दगडांनी बांधलेल्या इमारतींचे दरवाजे आणि खिडक्या सुद्धा गुलाबी दिसत होत्या. वर्नर मॉनेस्टरीच्या स्वयंपाक घरातून बर्फात बाहेर पडला. त्याच्या हातात कुत्र्यांना खाण्यासाठी असलेल्या अन्नाची ताटली होती. त्याने कुत्र्यांच्या जागेचा जड दरवाजा उघडला.

“चला, खाण्याची वेळ झाली,” त्याने आवाज दिला. आत मोठा आणि जवळपास रिकामी खोली होती. भिंतीला लागून गवताचा गंज होता. त्यातून मोठे आणि पांढरे कुत्रे बाहेर आले. त्यांची एकूण संख्या १४ होती. त्यांच्यातला जो सगळ्यात छोटा होता तो पण वजनाने वर्नर पेक्षा जड होता.

"अरे धक्के देण्याची गरज नाही," वर्नरने त्यांना सांगितलं. "सगळ्यांना खायला मिळेल."

कुत्री जवळ येत होती, पण ते आता ढकलत नव्हते. त्यांना माहीत होतं ते किती बलवान आहेत. वर्नरने सगळ्यांचे वाडगे भरले. मग शेवटी मोठे वाडगे घेऊन तो मोठ्या खोलीच्या एका शांत कोपऱ्यात गेला.

त्या कुत्र्यांमधला एक निघाला आणि वर्नरच्या मागे केला. "हे घे तुझे खाणे बॅरी, मी सगळ्यात चांगले तुकडे तुझ्यासाठी राखून ठेवले आहेत."



खायला सुरुवात करण्याआधी बॅरीने आपले डोके वर्नरच्या हनुवटीच्या खाली ठेवले आणि नाकाने गुरगुर करू लागला. आपल्या मोठ्या तोंडात त्याने वर्नरचा हात पकडला आणि हलवला, जसे तो नेहमी करत असे.

सेंट बर्नार्ड मॉनेस्ट्री जिथे कुत्री राहत असत ती स्विझरलँडच्या उंच पर्वतामध्ये आहे. त्याकाळी मोटरगाड्या आणि रस्ते नव्हते. दळणवळणासाठी फक्त घोडे आणि पहाडावरील पायवाटा होत्या. पहाडातून बाहेर येण्यासाठी एकच रस्ता लांबच लांब दरीतून होता. ज्याला सेंट बर्नार्ड दरी म्हणत असत.

त्या दरीचे नाव सुद्धा मठाच्या नावावरून पडले होते. मठात दगडांनी बांधलेली इमारत होती, जिथे ख्रिश्चन पाद्री राहत आणि काम करत असत. हे पाद्री पवित्र पुरुष होते. जे एक खास प्रकारचे काम करत असत. ते दरी पार करण्यासाठी प्रवाशांना मदत करत असत. थंडीत पहाडांवरच्या पायवाटेवर खूप बर्फ साचत असे. कधी प्रवासी अचानक झालेल्या हिमस्खलनात बर्फाच्या खाली दबून जात असत. तेव्हा पाद्री त्यांचा शोध घेण्याचे आणि त्यांना वाचवण्याचे काम करत असत.

या कामासाठी ते विशिष्ट जातीच्या कुत्री पाळत असत, ज्यांना सेंट बर्नार्डच म्हटले जात असे ती कुत्री मोठी आणि बलवान असतात जी बर्फाखाली दबलेल्या माणसांना शोधून काढत असत.

तसे तर वर्नरचे सगळ्या कुत्र्यांवर प्रेम होते, पण बॅरीवर त्याचे खास प्रेम होते. बॅरी पण वर्नर सारखाच बचाव कार्यात मदत करण्यासाठी खूप छोटा होता.

“इथे खूप धोका आहे,” पाद्री वर्नरला म्हणत असत. “तुला आणि बॅरीला मोठं होण्याची वाट बघवी लागेल.”

खाणं झाल्यावर बॅरी आणि वर्नरने थोड्यावेल दंगामस्ती केली. नंतर वर्नरने खाण्याचे भांडे उचलले आणि स्वयंपाक घराकडे निघाला. त्याचे खाणे सुद्धा आत्तापर्यंत तयार झाले असेल. त्याला चांगली भूक लागली होती. पण रस्त्यात फादर बॅनडिक्ट यांनी त्याला हाक मारली, “वर्नर,जरा इकडे ये.”



फादर बैनेडिक्ट दोन धापा टाकणाऱ्या घोड्यांजवळ उभे होते. त्या घोड्यांवर स्वार होऊन जी व्यक्ती आली होती, टी पण तिथेच उभी होती.

वर्नरने भांडे खाली ठेवले आणि त्यांच्याजवळ गेला. फादर बैनेडिक्ट यांनी म्हटले, “आपल्याकडे पाहुणे आले आहेत वर्नर, तू त्यांचे घोडे तबेल्यात घेऊन जा.”

वर्नर त्या दोघांकडे पाहून हसला आणि त्यांचे घोडे घेऊन तो गेला, त्यामुळे त्यांची रात्र आरामात जाईल. जेव्हा त्याने घोड्याच्या पाठीवरचे ओझे उतरवले, ते खूप जड होते, त्याने काठी कोपऱ्यात ठेवली आणि त्या गाठोडयात काय होते ते बघितले.

त्याने विचार केला, “जर मी पाद्री असतो तर असे उघडून बघू शकलो नसतो, बरं झालं मी पाद्री नाही ते.”

त्या गाठोडयात एक जड बंदूक आणि कातडयाची पिशवी होती. वर्नरला वाटले की नक्कीच त्यात सोन्याची नाणी असतील. त्याचे हृदय जोरजोरात धडकू लागले.

तबेल्याचा दरवाजा वेगाने वाहणाऱ्या वाऱ्यामुळे उघडला. वर्नर दचकला. पण तिथे तर फक्त फादर बैनेडिक्ट होते. “इकडे या फादर,” त्याने हळू आवाजात म्हटले. आता त्याला कबूल करावे लागेल की त्याने गाठोडयात डोकावून पाहिले आहे. पण लुटारूच्या गोळ्या खाण्यापेक्षा हे बरे आहे.

फादर बैनेडिक्ट आत आले.





"हे बघा," वर्नरने म्हटले. हे लोक लुटारू आहेत. त्यांच्या गाठोडयात बंदूक आहे आणि सोन्याच्या नाण्यांची पिशवी आहे. मला माहीत आहे की मी असे गाठोडे सोडून बघायला नको होते पण.."

फादर बैनेडिक्टने यांनी शांतपणे म्हटले, "सैंट बर्नार्डचे दरवाज़े त्या सर्वांसाठी उघडे आहेत, ज्यांना आश्रयाची गरज आहे."

"पण फादर! त्यांच्याजवळ बंदूक आहे, ते आपल्याला लुटायला आले आहेत."

पण फादर फक्त हसले. ते म्हणाले, "हे आपल्याला माहीत नाही, हो ना? आपल्या पाहुण्यांनी त्यांची झोळी मागितली आहे. मी त्या घेऊन जातो. तुझे जेवण थंड होण्याआधी तू आत ये." फादर यांनी झोळी उचलून खांद्याला लावली.

स्वयंपाक घरात शिरतांना वर्नर आपली मान हलवत होता. फादर बैनेडिक्टची कधीच न भंगणारी शांतता त्याला नेहमी गोंधळात टाकत असे. फादर पण वर्नरच्या मागेमागे स्वयंपाक घरात आले. गरम सुपाचा आणि कांद्याचा सुगंध सगळीकडे पसरला होता.

मोठ्या लांब टेबलावर बारा पाद्री आणि दोन प्रवासी बसलेले होते. वर्नर त्या अनोळखी लोकांपासून दूर बसला. त्याने त्यांच्या चेहऱ्यावर काही दिसतं का बघण्याचा प्रयत्न केला, पण काही समजणे कठीण होते,कारण त्या अनोळखी लोकांच्या नंतर अंगरखा घातलेले सहा पाद्री बसलेले होते.

शेवटी जेवण झाले. अनोळखी मधला एक उठला. त्याच्या हातात बंदूक होती. "जेवणासाठी धन्यवाद," तो म्हणाला. "पण आता मी तुम्हाला तुमच्या पैशांसाठी धन्यवाद देऊ इच्छितो."



वर्नरने घाबरून बंदुकीकडे बघितले. आणि मग आपल्या समोर बसलेल्या पाद्रीकडे, त्यांचे सर्वांचे चेहरे शांत होते.

फादर बैनेडिक्ट म्हणाले, “आमचा संघ गरीब आहे. आमच्याजवळ काहीही पैसे नाहीत.”

लुटारू हसला, “मला माहीत आहे, तुम्ही सगळ्यांनी उठा आणि एकमेकांजवळ उभे रहा.”

सगळे पाद्री आणि वर्नर टेबलांजवळून उठून उभे राहिले. वर्नरला वाटले तो एकटाच आहे जो घाबरला आहे.

फादर बैनेडिक्ट म्हणाले, ‘‘ठीक आहे, मी तुम्हाला मूर्ख बनवू शकलो नाही, आता या बाजूला चला.”

त्यांनी दरवाज़ा उघडला आणि अंगणाकडे निघाले. बाकी पाद्री आणि वर्नर त्यांच्यामागे गेले. लुटारू पाद्रीच्या मागे होते. फादर मोठ्या शालिनतेने कुत्र्यांच्या घराकडे निघाले. वर्नर चक्रावला,त्याला माहीत होते की ती जागा म्हणजे खजिना नव्हता. त्याने काही म्हणण्यासाती तोंड उघडले.



जवळ उभ्या असणाऱ्या पाद्रीनी त्याला कोपराने खेचले.

दरवाज्याजवळ फादर थांबले, आणि एकीकडे झाले आणि म्हणाले, “भल्या माणसांनो हे वाटून घ्या.”



लुटेरे तेज़ी से आगे बढ़े। उन्होंने वह भारी दरवाज़ा बस खोला ही था कि, चौदह के चौदह भारी-भरकम कुत्ते उन पर लपके। उनके मुँह खुले थे। और चाँद की रौशनी में उनके दांत चमक रहे थे। जो सबसे बड़ा था, उसने लुटेरे की बाज़ू मुँह में पकड़ी, उसे हिलाया और गुर्राने लगा।

कुत्तों के धक्कों से लुटेरों की बन्दूक हवा में छिटकी और मुलायम बर्फ में दफ्न हो गई। डर से चीखते, चिल्लाते लुटेरे अस्तबल की ओर भागे। मिनटों में वे अपने घोड़ो पर सवार हुए, और अंधेरे में गुम हो गए।

पादरी हंसे और अपनी रौशन गर्म रसोई घर में लौट गए। वर्नर कुत्तों को उनके बाड़े में ले गया। उसके चेहरे पर चौड़ी मुस्कान थी। "बैरी तुम तो कमाल के चोर-भगाऊ हो। तुमने उन्हें सचमें दहला दिया। मुझे इससे बहुत ही खुशी हुई।"

बैरी हल्के स्वर में गुर्रा रहा था। उसने वर्नर की कलाई मुँह में थाम ली। उसकी पूंछ खुशी से हिल रही थी।





महिने गेले आणि लवकरच उन्हाळा आला.पर्वत इतके उंच होते की उन्हाळ्यातही दर आठवड्याला बर्फवृष्टी होत असे. जेव्हा फुले उमलायची तेव्हा त्यांच्या पाकळ्यांवरही बर्फ असायचा. उन्हाळ्यात पर्वत खूपच सुंदर दिसत होते. बॅरीचा पहिला वाढदिवस जूनमध्ये आला आणि त्यासोबत त्याचे प्रशिक्षण सुरू झाले.

लुइगी हे एक वयस्कर पण कुत्र्यांचे अनुभवी प्रशिक्षक होते. ते दररोज बॅरीला इतर लहान कुत्र्यांसह बाहेर घेऊन जायचे. सर्व कुत्रे उड्या मारत तीन तास बर्फात खेळत. वर्नर त्यांच्यासोबत पाहण्यासाठी, शिकण्यासाठी आणि शक्य असेल तेव्हा त्यांना मदत करण्यासाठी जाई. लुईगी लवकरच म्हातारे होतील तेव्हा त्यांना मोठ्या कुत्र्यांना हाताळणे कठीण होणार होते. वर्नरला आशा होती की तो कधीतरी त्याची जागा घेईल.

प्रशिक्षणात वर्नरची भूमिका सहसा कुत्र्यांपासून लपण्याची होती. तो स्वतःला बर्फात गाडून घ्यायचा आणि कुत्री त्याला शोधेपर्यंत तिथेच राहायचा. सर्व कुत्री माणसांना हुंगण्यात तज्ञ होते. पण मोठे नाक असलेला बॅरी इतरांपेक्षा वेगळा होता. तो जवळजवळ नेहमीच प्रथम वर्नरला शोधत असे. मग बॅरी त्याच्या नखांनी बर्फ खोदून काढायचा. तो वर्नरजवळ झोपायचा आणि त्याचा चेहरा चाटायला सुरुवात करायचा. दोघेही वर्नरला थंडी वाजल्यासारखे भासवत. वर्नरने शांत झोपण्याचा प्रयत्न करे, पण बॅरीची उग्र जीभ त्याला गुदगुल्या करत असे. काही वेळाने तो हालचाल करू लागे मग. बॅरीची शेपटी आनंदाने हाले आणि ते दोघे बर्फात लोळू लागत.

जेव्हा हिवाळा आला तेव्हा बॅरीला खिंडीवरून मार्चमध्ये सोबत जाण्याची परवानगी देण्यात आली. तो प्रवाशांना खिंड ओलांडण्याचा मार्ग दाखवत असे आणि अडचणीत अडकलेल्या प्रवाशांना शोधत असे. अचानक आलेल्या हिमस्खलनात कोणताही प्रवासी गाडला जाऊ शकत असे.



आणि जर वेळेवर मदत मिळाली नाही तर त्यात अडकलेले प्रवासी थंडीमुळे गोठत असत किंवा हवेशिवाय त्यांचा जीव गुदमरत असे. दररोज सकाळी बॅरी लुईगी किंवा दुसऱ्या पाद्री सोबत डोंगरावरून खाली जात असे. पायवाटेजवळ एक दगडी झोपडी होती. जर त्यात एखादा प्रवासी बसला असेल तर तो त्याला धोकादायक खिंड ओलांडण्यास मदत करत असे. प्रवाशाला सोडण्यासाठी आणि परतण्यासाठी त्याला संपूर्ण दिवस लागायचा.हिवाळ्याच्या अखेरीस हे स्पष्ट झाले की बॅरी हा बचाव पथकातील सर्वोत्तम कुत्रा आहे. बर्फात गाडलेल्या लोकांना तो सर्वात आधी शोधून काढी. तो त्यांना लवकर बाहेर काढायचा. त्याला उबदार करण्याचा सर्वात जास्त प्रयत्न बॅरीच करत असे. बऱ्याच वेळा इतर कुत्रे थकून थांबायचे. पण बॅरी त्याचा गोठलेला चेहरा चाटत राही, जोपर्यंत थोडी हालचाल होत नाही. मग तो आनंदाने वेडा व्हायचा.

जसजशी वर्षे जात गेली तसतसे वर्नर बारीक आणि उंच होत गेला.

आता त्याने आपला सर्व वेळ कुत्र्यांसाठी समर्पित केला. तो दररोज लुईगीसोबत काम करायचा. तो त्यांना खायला घालायचा, त्यांच्यासोबत खेळायचा आणि लहान कुत्र्यांना प्रशिक्षण द्यायचा. तो पूर्णपणे आनंदी होता.

बॅरी सहा वर्षांचा होता तेव्हा वर्नर अठरा वर्षांचा होता. त्या वर्षी पाद्रींनी सहन केलेला तो सर्वात कडक हिवाळा होता. बचावासाठी दररोज बाहेर पडावे लागत असे. त्या हिवाळ्यात प्रवाशांचे प्राण वाचवण्याचा प्रयत्न करताना मठातील अर्धे कुत्रे मेले. अनेक पाद्रयांना  आपले प्राण गमवावे लागले. ते एका हिमवादळात हरवले आणि त्यांच्यासोबत असलेले कुत्रे त्यांना वाचवू शकले नाहीत.

मार्चच्या अखेरीस एका रात्री, वर्नर आणि बॅरी रस्त्याने घरी परतत होते. वर्नरचा चेहरा थंडीने कडक झाला होता. बॅरी देखील थकलेला दिसत होता. हा हिवाळा दोघांसाठीही कठीण होता. आकाश काळे होते. दोन्ही बाजूंनी अगदी जवळ असलेल्या पर्वतांची शिखरे अंधारात दिसत नव्हती. खाली पडलेल्या बर्फातून थोडीशी चमक येत होती.

अचानक वरून धाडकन आवाज आला. वर्नर आणि बॅरी यांना हा आवाज चांगलाच माहित होता आणि ते त्याला घाबरत होते. वर्नरने गुडघे टेकले आणि बॅरीला त्याच्या जवळ ओढले.

तो आवाज डोंगराच्या एका बाजूने बर्फ कोसळण्याचा होता. मग, जेव्हा सर्व शांत झाले तेव्हा वर्नर उभा राहिला. त्याचे हृदय वेगाने धडधडत होते. "आपण थोडक्यात वाचलो, बॅरी," तो म्हणाला. "आपण मेलो असतो." चला आता घरी जाऊया, म्हणजे आपण त्यांना सांगू शकू की आपण जिवंत आहोत."तो पुढे गेला. पण बॅरी त्याच्या मागे गेला नाही. तो डोंगराच्या उताराकडे पाहत उभा राहिला. तो हवेत वास घेत होता."काही आहे का?" जा त्याला शोध!”



पण बॅरी तिथेच पुतळ्यासारखा उभा राहिला. तो काही गोंधळात असल्यासारखा वाटत होता. वर्नरला खूप थंडी जाणवत होती. तो आयुष्यात कधीच इतका थकला नव्हता. "चल, बॅरी," त्याने आदेश दिला. त्याने त्याच्या गळ्यातला  पट्टा ओढला. पण बॅरीने त्याचे दोनशे पौंड वजनाचे शरीर हलू दिले नाही.वर्नरने पुढची काही मिनिटे बॅरीला या ना त्या मार्गाने चिथावण्यात घालवली. पण बॅरी डगमगला नाही. तो तिथे पुतळ्यासारखा उभा राहिला.

"ठीक आहे, तुला वाटेल तेव्हा घरी ये. तुला मार्ग माहित आहे." वर्नर त्याला तिथेच सोडून घराच्या उबदार वातावरणाकडे निघाला.त्या रात्री बॅरी घरी परतलाच नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी पाच पाद्री त्याला शोधायला  बाहेर पडले. वर्नर त्यांना बॅरीला जिथे सोडले होते तिथे घेऊन गेला. पण तो तिथे नव्हता. वारा आणि वाहणाऱ्या बर्फाने त्याच्या पंजाचे ठसे झाकले होते.पाद्री दिवसभर त्याचा शोध घेत होते, आणि दुसऱ्या दिवशीही.

पण त्यांना बॅरीचा कोणताही मागमूस सापडला नाही.दुसऱ्या दिवशी संध्याकाळी, वर्नर शोध पथकापासून वेगळा झाला आणि परतला. त्याला इतर कुत्र्यांची काळजी घ्यावी लागली. त्याला त्याचे काम करायचे होते. पण बॅरीचा शोध अशा प्रकारे सोडून दिल्याबद्दल त्याला वाईट वाटत होते. तो त्याच्या आयुष्यात इतका दुःखी कधीच झाला नव्हता. बॅरी त्याचा सर्वात जवळचा मित्र होता, पण वर्नरने त्याला एकटे सोडले होते आणि आता बॅरी हरवला होता. मला आशा आहे की तो मरणार नाही!वर्नर स्वयंपाकघरात गेला. त्याने एका मोठ्या पातेल्यात कुत्र्यांसाठी अन्न तयार केले. तो कुत्र्यांच्या खोलीच्या दाराकडे चालत असताना, त्याला बॅरीला जेवायला घालणाऱ्या आणि त्याच्यासोबत खेळणाऱ्या रात्री आठवल्या.

मग अचानक त्याला तबेल्याजवळ सावलीत काहीतरी दिसले. पाठीला गठ्ठा बांधलेला एक कुत्रा हळूहळू चंद्रप्रकाशात आला. वर्नरने वाटी फेकली आणि त्याच्याकडे धावला. "बॅरी!" देवाचे आभार!”



बॅरी खूप हळू पुढे येत होता. तो प्रत्येक पाऊल काळजीपूर्वक टाकत होता. तो वर्नरजवळ येताच त्याची शेपटी खूप हळू हलू लागली.वर्नरने त्याच्या पाठीला बांधलेले गाठोडे सोडले. "फादर बेनेडिक्ट!" तो जोरात ओरडला. त्याच्या किंकाळ्याचे प्रतिध्वनी पर्वतशिखरांवर ऐकू येत होते “बेनेडिक्ट.,, डिक्ट.,, डिक्ट."

बॅरीच्या छातीभोवती एका महिलेची शाल बांधली होती. आत, वर्नरचे हात एका बाळाला लागले. त्या लहान मुलाचे शरीर ताठर झाले होते.

फादर बेनेडिक्ट आणि इतर काही पाद्री धावत आले. त्यांचे काळे झगे पंखांसारखे वाऱ्यावर उडत होते. त्याने मुलाचे तोंड उघडले आणि त्यात श्वास भरला. रक्ताभिसरण सुधारण्यासाठी त्याच्या शरीरावर बर्फ चोळला. बऱ्याच वेळाने, मूल थोडे हलले आणि नंतर मोठ्याने रडले. पाद्री जवळजवळ गोठलेल्या बाळावर काम करत असताना, वर्नर हळूहळू बॅरीला कुत्र्यांच्या अंगणात घेऊन गेला. त्याने बॅरीला खायला घालण्याचा प्रयत्न केला, पण तो इतका थकला होता की त्याला चावणे शक्य नव्हते. जेव्हा तो झोपण्यासाठी गवतावर झोपला तेव्हा त्याचे डोके वर्नरच्या मांडीवर होते. वर्नरचा हात त्याच्या मानेखाली होता.



बाळाच्या आईचा मृतदेह काही दिवसांनी सापडला. बॅरी त्या महिलेपर्यंत पोहोचला तोपर्यंत ती खूपच अशक्त झाली असेल. मरण्यापूर्वी, तिने कसा तरी त्याच्या मुलाला त्याच्या शालने बॅरीच्या पाठीवर बांधले असेल.या बचाव घटनेनंतर, बॅरीची कीर्ती जगभर पसरली. इंग्लंडमधील एका तेरा वर्षांच्या मुलाने बॅरीने केलेल्या सुटकेच्या कथा ऐकल्यानंतर त्याचे चित्र काढले. तो मुलगा मोठा होऊन सर एडविन लँडसीर झाला, जो कुत्र्यांना रंगविण्यासाठी प्रसिद्ध झाला.

घटनेच्या तीन वर्षांनंतर, फादर लुइगी एका बचाव कार्यात हरवले. जेव्हा ते परतले नाहीत, तेव्हा फादर बेनेडिक्ट यांनी कुत्र्यांच्या वाड्याचा दरवाजा उघडला आणि बॅरीला त्याच्या "मालकाला" शोधायला सांगितले.बॅरीने त्यांना बर्फाच्या ढिगाऱ्याखाली शोधले. त्या प्रचंड प्राण्याने खूप प्रयत्न केले, पण तोपर्यंत खूप उशीर झाला होता. लुईगी यांचे निधन झाले होते. वर्नरला जड अंतःकरणाने प्रशिक्षकाची जबाबदारी स्वीकारावी लागली.

आणखी तीन वर्षे गेली. ऑक्टोबर महिना होता आणि दिवस ताजा आणि थंड होता. पण रात्र पडताच, वर्षातील पहिली जोरदार हिमवृष्टी झाली.मठाच्या स्वयंपाकघरात तीन जुने मित्र शेकोटी पेटवून एकमेकांच्या सहवासाचा आनंद घेत होते. फादर बेनेडिक्ट आणि वर्नर आगीच्या अगदी जवळ बसले होते. बॅरी त्या दोघांमध्ये काही अंतरावर होता. त्याला जळत्या आगीची उष्णता आवडत नव्हती.वर्नर आता स्वतः एक पाद्री बनला होता. तो चोवीस वर्षांचा होता. त्याने आपला पाय उचलला आणि त्याच्या बुटाच्या पुढच्या भागाने बॅरीच्या कंबरेला मारायला सुरुवात केली. बॅरीचे डोळे बंद होते, पण त्याची शेपटी जमिनीवर टेकू लागली. तो त्याच्या पाठीवर झोपला जेणेकरून वर्नरलाही त्याच्या छातीवर हात लावता येईल.बॅरीच्या डोक्याच्या गडद तपकिरी भागावर काही पांढरे केस दिसू लागले होते. त्याची पाठही थोडीशी वाकू लागली, ज्याचा परिणाम त्याच्या चालण्यावर दिसून येत होता.



पण जेव्हा दररोज सकाळी मठातील कुत्र्यांना धावण्यासाठी बाहेर काढले जायचे, तेव्हाही बॅरी निळ्या-पांढऱ्या बर्फावर तितक्याच उत्साहाने उड्या मारत असे.स्वयंपाकघरात काही मिनिटे शांतता होती. "मी स्वार्थी आहे ना?" वर्नर म्हणाला.

ते दोघे एकमेकांच्या इतके जवळ होते की फादरला त्याच्या म्हणण्याचा अर्थ काय आहे हे विचारण्याची गरज पडली नाही. “बॅरीसारख्या मित्राला सोडून जाणे सोपे नाही,” फादर हळूवारपणे म्हणाले."पण हे त्याचे शेवटचे वर्ष असेल," वर्नर म्हणाला. "इथल्या जुन्या कुत्र्याना हिवाळा खूप त्रासदायक असतो." मला वाटतं आपण त्याला बचावासाठी वापरणार नाही. आपण त्याला सोबत ठेवू. मग पुढच्या उन्हाळ्यात जेव्हा आपण पिल्लांना विकायला घेऊन जाऊ, तेव्हा बॅरीलाही सोबत घेऊन जाऊ. तिथले आपले मित्र त्याची काळजी घेतील. बॅरी संपूर्ण उन्हाळ्यात आराम करू शकेल. त्याने हा आराम कमवला आहे.“ फादर झोपलेल्या कुत्र्याकडे पाहून हसले. "हो, बॅरी आपल्या कुत्र्यांपैकी सर्वोत्तम आहे. त्याच्यासारखा समर्पित कुत्रा पुन्हा सापडण्याची शक्यता कमी आहे. बॅरीने एकट्याने ४० जणांचे जीव वाचवले आहेत. हा खरोखरच एक विक्रम आहे."

मला आशा आहे की या उन्हाळ्यात लहान पिल्ले होतील." "दारावर ठोठावण्याच्या आवाजाने वर्नरचे बोलणे थांबले. त्याने फादरकडे बघितले.

प्रवाशांना तिथे पोहोचण्यास बराच उशीर झाला होता. दोघांनीही दगडांनी बनवलेला एक लांब कॉरिडॉर ओलांडला. झोपाळू बॅरी देखील जांभई देत त्यांच्या मागे गेला.वर्नरने दार उघडले. त्याला बाहेर पायऱ्यांवर एक मुलगा उभा असलेला दिसला, तो थंडीने थरथर कापत होता.
"आत ये बाळा," वर्नर म्हणाला.



मुलाला पटकन स्वयंपाकघरात नेण्यात आले. थंडीमुळे त्याचे हात कडक झाले होते म्हणून वर्नरने त्याला त्याचा कोट काढण्यास मदत केली. पाद्र्यांनी आगीचे निखारे उलटे केले आणि सूपचे भांडे उकळायला ठेवले.जेव्हा तो मुलगा बोलू लागला, तेव्हा तो म्हणाला, "तुमच्या दयाळूपणाबद्दल धन्यवाद." तो लहान आणि बारीक होता. त्याच्या कपड्यांवरून तो एका शेतकऱ्याच्या मुलासारखा दिसत होता. "माझा भाऊ मार्टिन तीन दिवसांपूर्वी घरातून पळून गेला. त्याला सैन्यात भरती होण्याचा आदेश देण्यात आला होता. पण तो सैन्यात भरती होऊ इच्छित नव्हता. म्हणून तो शांतपणे घरातून पळून गेला. त्याने फक्त पाव आणि तो कापण्यासाठी चाकू घेऊन गेला आहे. आमच्या आईने मला सांगितले की तुम्हाला त्याला शोधायला सांगावे." त्याचे डोळे अश्रूंनी चमकत होते. तो ते लपवण्याचा प्रयत्न करत होता. "तुला माहित आहे का तो कोणत्या दिशेने गेला?" फादर बेनेडिक्टने विचारले.दरम्यान, वर्नर इतर पाद्रींना बोलावून कुत्र्यांना जागे करण्यासाठी गेला होता.







काही मिनिटांतच, बचाव पथक शोधण्यासाठी बाहेर पडले - आठ पाद्री आणि सहा कुत्रे. बॅरीला स्वयंपाकघरात बंद करून वर्नर आत आला. पण त्या म्हाताऱ्या पण धाडसी कुत्र्याला एक उघडा दरवाजा सापडला आणि तो थेट वर्नरकडे धावला!रात्री पौर्णिमेचा चंद्र प्रकाश पसरवत होता. बर्फ पडणे थांबले होते.

हलक्या राखाडी बर्फाच्या पार्श्वभूमीवर झाडे, खडक, पाद्री, सर्व काळे दिसत होते. बचाव पथक डोंगरात मुलाने सांगितलेल्या ठिकाणी पोहोचले. तिथे पोहोचल्यावर त्यांनी स्वतःला गटांमध्ये विभागले आणि एका विशिष्ट क्षेत्रात  शोध सुरू केला. प्रत्येक पाद्रीच्या हातात एक लांब काठी होती, जी तो बर्फात चिकटवून मार्टिन हिमस्खलनात गाडला गेला आहे की नाही हे तपासत असे.

बॅरी ऑर वर्नर इतरांपेक्षा खूपच खाली आले होते. एकीकडे वर्नरचे मन मार्टिनला शोधत होते, पण त्याच्या मनाचा दुसरा भाग असा विचार करत होता की कदाचित हे त्याचे बॅरीबरोबरचे शेवटचे फिरणे आहे. बॅरीच्या झुडुपाच्या मागे शेपटी हलवत  त्या पर्वतांमध्ये चालत आहे, जे दोघांनाही खूप आवडते.गेल्या काही वर्षांत, वर्नरने शेकडो कुत्री पाळली आहेत. त्यापैकी बरेच जण बॅरीचे मुलगे आणि मुली होते. पण बॅरीच्या डोळ्यात प्रतिबिंबित होणारी नैसर्गिक हुशारी कोणाकडेही नव्हती. आणि त्यापैकी कोणीही मानवी जीव वाचवण्यात इतके कुशल नव्हते. वर्नरसाठी कोणताही कुत्रा इतका महत्त्वाचा नव्हता.ते दोघेही टेकडीच्या उतारावर एकटेच होते. बॅरी पुढे जात होता, त्याचे नाक बर्फाच्या जवळ होते. अचानक तो थांबला, त्याचे मोठे डोके वर केले आणि ते हळू हळू उजवीकडून डावीकडे वळवले.

मग तो उतारावरून वेगाने धावत गेला आणि पाइनच्या झाडाच्या मागे गायब झाला. वर्नरने त्याला हाक मारली आणि त्याच्या मागे धावला.अचानक एक ओरड ऐकू आली, "एईईईईई". , , अस्वल! "वर्नर झाडांजवळ पोहोचला आणि थांबला. एक तरुण झाडाला धरून उभा होता, त्याच्या हातातला चाकू रक्ताने लाल झाला होता. बॅरी त्याच्या पायाजवळ पडला होता.



आयुष्यात पहिल्यांदाच, वर्नरने त्या माणसाकडे लक्ष दिले नाही. तो बॅरीजवळ गुडघे टेकून रडू लागला. बॅरीच्या काखेत आणि मानेवर चाकूने अनेक वार झाले होते.पण रक्ताळलेले  त्याचे विशाल हृदय अजूनही धडधडत होते.एक तासानंतर, मार्टिन आणि बॅरी यांना स्ट्रेचरवरून मठात नेण्यात आले. तो मुलगा मठातील सर्वात उबदार खोलीत झोपला होता. त्याचा भाऊ त्याच्या शेजारी बसून पहारा देत होता.

बॅरी स्वयंपाकघरात मऊ ब्लँकेटवर झोपला होता. तो अजिबात हलला नाही. त्याच्याभोवती काळे वस्त्र परिधान केलेले पाद्री  शांतपणे उभे होते, त्यांचे डोळे अश्रूंच्या रूपात त्याच्यावरील प्रेमाने भरलेले होते."तो बराच म्हातारा आहे," फादर  हळू आवाजात म्हणाले. "इतके रक्तस्त्राव झाल्यामुळे. , ,"तो बरा होईल," वर्नरचे जबडे इतके घट्ट झाले होते की त्याचे शब्द बाहेर पडणे कठीण झाले.



फादरने  वर्नरच्या खांद्यावर हात ठेवला. "मला आशा आहे की तुम्ही त्या मुलाला दोष देणार नाही. तो थंडीने आणि भीतीने वेडा झाला होता. बॅरी चंद्रप्रकाशात त्याच्याकडे उडी मारत आला असावा. बॅरीला अस्वल समजणे ही त्याची स्वाभाविक चूक होती. त्याला वन्य प्राण्यांची भीती वाटत असावी."

"मला माहित आहे," वर्नर एक दीर्घ श्वास घेत म्हणाला. "मी त्याला दोष देत नाही, पण बॅरीला कसे वाटले असेल याबद्दल मला आश्चर्य वाटते. तो प्रेमाने पुढे आला आणि त्याच्यावर वारंवार चाकूने वार करण्यात आले."

फादर बेनेडिक्ट अवाक झाले. त्यांना सांत्वनपर काय बोलावे सुचत नव्हते. ती रात्र आणि दुसऱ्या दिवशीही बॅरी शांतपणे पडून होता. वर्नरने त्याच्या पट्ट्या घट्ट बांधल्या. तो बॅरीचे डोके मांडीवर घेऊन तासन् तास बसला. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी बॅरीने हालचाल केली. त्याचे डोळे उघडले. त्याची शेपटी वर आली आणि ब्लँकेटच्या बेडवर पडली. त्याने तोंड उघडले आणि वर्नरचा हात हळूवारपणे त्याने जबड्यात घेतला.दुसऱ्या दिवशी सकाळी तो थोडे पाणी आणि काही अन्न गिळू शकला. त्या संध्याकाळपर्यंत हे स्पष्ट झाले की तो मरण्यास तयार नव्हता. सेंट बर्नार्ड मठाच्या प्राचीन भिंतींमधून आनंदाचे प्रतिध्वनीत ऐकू येत होते.



दोन वर्षे, बॅरीने गावात शांतपणे निवृत्ती घेतली आणि वृद्धापकाळाने त्याचे निधन झाले. त्यांचे पार्थिव स्विस संग्रहालयात प्रदर्शनासाठी ठेवण्यात आले.

बॅरीच्या मृत्यूनंतर शंभर वर्षांनी, सेंट बर्नार्ड मठात आणखी एक कुत्रा होता ज्याचे नाव बॅरीच्या नावावरून ठेवण्यात आले होते. तेव्हापासून सर्वोत्तम कुत्र्याला बॅरी हे सन्माननीय नाव देण्याची परंपरा बनली.आजही तिथे एक बॅरी आहे.



एक तरुण बर्फात हरवतो - तो बर्फाखाली कुठेतरी गाडला गेला असण्याची शक्यता असते. बचाव कुत्रे चंद्रप्रकाशात उतारावर धावतात. हे बळकट सेंट बर्नार्ड कुत्रे आहेत, ज्यांचे तीक्ष्ण नाक त्यांना बर्फाखाली गाडलेले मानव शोधण्यास मदत करते. आणि त्यांचे मजबूत पंजे त्यांना बर्फातून खोदण्यासाठी सहकार्य करतात. बॅरी बचाव पथकाचे नेतृत्व करतो. त्याने ४० हून अधिक लोकांचे प्राण वाचवले आहेत. पण आज तो स्वतःचा जीव धोक्यात घालत आहे. हरवलेला तरुण घाबरला आहे. त्याच्याकडे चाकू आहे. अंधारात तो कुत्र्याला वन्य प्राणी समजतो!ही सर्वात धाडसी सेंट बर्नार्ड बॅरीची खरी कहाणी आहे.